**वैध मापन शास्त्र, नागपूर विभागातील मौजे फुलचूर ता. गोंदिया येथील ईमारतीच्या आवारात ६ मीटर बाय ४.५७ मिटर ची सिमेंट काँक्रीटची रुम, अटॅच संडास बाथरुम व टँकर कॅलीब्रेशनच्या टॉवरची उभारणी करण्याकरीता सुधारित प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत..**

महाराष्ट्र शासन

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : वैमाशा-२०२५/प्र.क्र.२१ /ग्रा.सं.-३**

दुसरा माळा, मंत्रालय (विस्तार),
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २४ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ** - १) नियंत्रक, वैध मापन शास्त्र,मुंबई यांचे पत्र क्र. काजा (२८) / १४२५ /प्र.क्र.०६ /वैमाशा-२/९९, दि.३१.०१.२०२५.

२) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. १, गोंदिया यांचे पत्र क्र. ४४१ जा.क्र.४४१/२०२५, दि. २९/०१/२०२५

३) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७/०४/२०१५.

**प्रस्तावना:-** नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये मौजे फुलचूर, ता. गोंदिया येथील ईमारतीच्या आवारात ६ मीटर बाय ४.५७ मिटर ची सिमेंट कॉकरेटची रुम, अट्याच संडास बाथरुम व टँकर कॅलीब्रेशनच्या टॉवरची उभारणी करण्याकरीता रु. १२८.८६ लक्ष इतक्या खर्चाच्या प्राथमिक अंदाजपत्रक प्रशासकीय मंजुरी व निधी उपलब्ध करुन देण्याकरीता शासनास सादर केले आहे. त्यानुसार सदर अंदाजपत्रास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याचीबाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी मौजे फुलचूर, ता. गोंदिया, नागपूर विभाग येथील ईमारतीच्या आवारात ६ मीटर बाय ४.५७ मिटर ची सिमेंट कॉकरेटची रुम, अट्याच संडास बाथरुम व टँकर कॅलीब्रेशनच्या टॉवरची उभारणी करण्याकरीता रु. १२८.८६ इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.१ यांनी तयार केले असून त्यास कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.१ व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंडळ नागपूर यांची तांत्रिक सहमती घेण्यात आलेली आहे. सदर अंदाजपत्रक सन २०२२-२०२३ च्या सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दरसूची वर आधारित आहे. त्यानुसार **मौजे फुलचूर, ता. गोंदिया येथे उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, निरीक्षक, गोंदिया विभाग येथील ईमारतीच्या आवारात ६ मीटर बाय ४.५७ मिटर ची सिमेंट कॉकरेटची रुम, अटयाच संडास बाथरुम व टँकर कॅलीब्रेशनच्या टॉवरची उभारणी करण्याकरीता रु. १२८.८६ लक्ष इतक्या खर्चाचे अंदाजपत्रकास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.**

१.१ सदरचे काम हे पूर्णत: तांत्रिक स्वरुपाचे आहे. त्यामुळे सदरचे काम टँकर कॅलीब्रेशन क्षेत्रात अनुभव असणाऱ्या कंपनी / आस्थापने मार्फतच करुन घ्यावे.

१.२ संबंधित आस्थापना / कंपनीकडे वैध मापन शास्त्र विभागाचा उत्पादक / विक्री / दुरूस्ती परवाना असावा.

**१.३** यासाठी लागणारे विविध वजने / मापे, संबंधित आस्थापना / कंपनीने, रितसर परवाना असणाऱ्याकडूनच खरेदी करणे आवश्यक आहे.

०२. उपरोक्त प्रयोजनार्थ या आदेशान्वये सन २०२४ -२०२५ या आर्थिक वर्षामध्ये रू.१२८.८६ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात येत आहे. तसेच सदर प्रयोजनार्थ नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत असून नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी सदर निधी संबंधित कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचेकडे हस्तांतरीत करावा.

०३. उपरोक्त खर्च मागणी क्रमांक, एम-५ मुख्य लेखाशिर्ष ५४७५ इतर सर्वसाधारण आर्थिक सेवांवरील भांडवली खर्च ८०० इतर खर्च (००) (०१) वजने व मापे यांच्या पायाभूत सुविधांचे बळकटीकरण (योजनांतर्गत) (५४७५ ०२४८) ५३ मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग पहिला, उप विभाग- पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका, परिच्छेद क्र.१३४ (१) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०३०७१८३४२७३६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

POOJA PRASAD MANKAR

Digitally signed by POOJA PRASAD MANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=2587c101141ff0822d1f39f866ca3537dfc0e52728f898604a75ff77b46e7415, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3063036B7F64E995ED6A8BC7C9FBB1A5A10E6562F73D65107AD668D006B3B164, cn=POOJA PRASAD MANKAR
Date: 2025.03.07 18:35:06 +05'30'

**(पूजा मानकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२.महालेखापाल-१, (लेखा व परीक्षा), मुंबई / नागपूर
३.नियंत्रक,वैध मापन शास्त्र, मुंबई.
४.वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर कार्यालयाच्या सिमेंट कॉकरेटची रुम, अट्याच संडास बाथरुम व टँकर कॅलीब्रेशनच्या टॉवरची उभारणी करण्याकरीता निधी मुक्त करण्याबाबत वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात यावा.
५.जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया
६.सह नियंत्रक,वैध मापन शास्त्र, नागपूर विभागीय कार्यालय, नागपूर
७. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जुने सचिवालय इमारत, जी.पी.ओ.चौक, सिव्हिल लाईन, नागपूर - ४४० ००१.(सोबत सुधारित Recapitulation Sheet जोडली आहे)
८. उप नियंत्रक,वैध मापन शास्त्र भंडारा - गोंदिया जिल्हे
९. वित्त विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती / ग्रा.सं.-३